**बाह्ययंत्रणेद्वारे मनुष्यबळाचा पुरवठा करणाऱ्या सेवा पुरवठादार संस्थेला/ एजन्सीचे देयक अदा करण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मबाआ २०२३/प्र.क्र.९२ (भाग-२)/का-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दि.२९ मार्च,२०२५.

**संदर्भ-** १. वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०२२/ प्र.क्र.१५/ आ.पु.क., दि.२७.०४.२०२२.

२.महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबाआ-२०२३/प्र.क्र.९२/का-७, दि.३०.०८.२०२४.

३. आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/नियो/कंत्राटीसेवा/२०२४-२५/का-२/१२७१,दि.२४.०२.२०२५

<u>प्रस्तावना :-</u>

महिला व बाल विकास विभागाच्या आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालये, शासकीय संस्थेमधील गट-क व ड ची ११४५ अकुशल पदे BRISK INDIA PRIVATE LIMITED (SMART SERVICES PVT LTD) या एजन्सीमार्फत बाह्ययंत्रणेव्दारे मनुष्यबळाचा सेवा पुरवठा करण्यासाठी संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर एजन्सीचे सन २०२४-२५ ची देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी दि.२४.०२.२०२५ रोजीच्या पत्रान्वये बाह्ययंत्रणेव्दारे मनुष्यबळाचा सेवा पुरवठा करण्याऱ्या एजन्सीचे सन २०२४-२५ ची देयके अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे.

२. तद्नुषंगाने बाह्ययंत्रणेव्दारे मनुष्यबळाचा सेवा पुरवठा करण्याऱ्या एजन्सीचे सन २०२४-२५ ची देयके अदा करण्यासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता २२३५ २०७२ या लेखाशिर्षातंर्गत १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टाखाली रु.३२७.७८ लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी सत्तावीस लाख अठ्यात्तर हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. बाह्ययंत्रणेव्दारे सेवा पुरवठाराचे देयकाची काटेकोरपणे तपासणी करुन विहीत कार्यपध्दतीनुसार खर्च करण्याची जबाबदारी विभाग प्रमुख म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास,महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च हा सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. एक्स-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, मुख्य लेखाशीर्ष २२३५-२०७२ मधील (०१) (१) महिला व बाल कल्याण संचालनालय (अनिवार्य), उद्दीष्टे १०, कंत्राटी सेवा या लेखाशीर्षाखाली उपलब्ध केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी चालू वित्तीय वर्षात खर्च करण्याची तसेच अखर्चित राहणारा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी समर्पित करण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२९/व्यय-६, दि.२७.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२९१५५९५२५८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASAD
VINAYAKRAO
KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2025.03.29 18:02:23 +05'30'

**(प्र. वि. कुलकर्णी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सह सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. अवर सचिव (का-४),महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. सर्व विभागीय उपआयुक्त,महिला व बाल विकास विभाग.
५. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
६. संबंधित कोषागार अधिकारी यांना माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी (आयुक्त, पुणे मार्फत).
७. निवड नस्ती, (का.७), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.